**सन २०११-२०१२ या वर्षाकरिता खावटी कर्ज वाटप योजनेची अंमलबजावणी करणे.**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
**शासन निर्णय, क्र. खाकवा-२०१०/प्र.क्र.९३/का.३**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : ८ मार्च, २०११.**

वाचा: १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र-शाआशा-१६०१/प्र.क्र.४३/का.१३ दिनांक ५ मे, २००१.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.खाकवा-२००४/प्र.क्र.९६/(भाग-२)/ का.८, दि.२० जुलै, २००४.
३) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग,क्र. खाकवा-२००५/प्र.क्र.८०/का.८, दि. २४ जुन, २००५.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.खाकवा-२००४/प्र.क्र.९६/(भाग-२)/ का.८, दि. ९ ऑगस्ट, २००५.
५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. खाकवा-२००७/प्र.क्र.८२/ का.८, दि. १९ मे, २००६.
६) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. याचिका-२००७/प्र.क्र.१४६/का-८, दि. २४ मार्च २००८.
७) शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र. याचिका - २००७/प्र.क्र.१४६/का-८, दि. ३० मे,२००८.

प्रस्तावना : आदिवासी भागात सावकार व व्यापाऱ्यांकडून होणाऱ्या आदिवासी लोकांची पिळवणूक थांबविण्यासाठी महाराष्ट्र आदिवासी आर्थिक स्थिती (सुधारणा) अधिनियम, १९७६ पारित करुन सावकारी बंद करण्यात आली. तसेच पावसाळयात जून ते सप्टेंबर या कालावधीत रोजगार उपलब्ध होत नाही म्हणून आदिवासी उपयोजना क्षेत्रातील आदिवासी (अल्प भूधारक, भूमिहीन व शेतमजूर) यांना आर्थिक अडचण निर्माण होऊ नये तसेच या कालावधीत (जून ते सप्टेंबर या कालावधीत) त्यांची उपासमार होऊ नये म्हणून सन १९७८ पासून खावटी कर्ज योजना सुरु करण्यात आली आहे. सदर योजना महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांचेमार्फत राबविली जात आहे. यासाठी शासनाकडून आदिवासी विकास महामंडळास निधी उपलब्ध करुन दिला जातो.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१०-२०११ या वर्षाकरीता एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी (मेळघाट) या प्रकल्प क्षेत्रामध्ये खावटी कर्ज योजना प्रायोगिक तत्वावर सार्वजनिक वितरण प्रणालीमार्फत राबवावयाचा निर्णय घेण्यात आला होता. तथापि सदर योजनेची फलनिष्पती लक्षात घेता सन २०११-२०१२ पासून खावटी कर्ज योजना आदिवासी विकास महामंडळामार्फत शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.खाकवा-२००४/प्र.क्र.९६/(भाग-२)/ का.८, दि.२० जुलै, २००४ च्या शासन निर्णयानूसार राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

२. सन २०११-२०१२ या वर्षासाठी ३ लाख आदिवासी कुटुंबांना खावटी कर्ज योजनेंतर्गत कर्ज वाटपाचे उद्दिष्ट निश्चित करण्यात येत आहे. सदर आर्थिक वर्षात खावटी कर्जाचे वाटप करण्यासाठी लाभार्थी निवडीची कार्यवाही

तात्काळ सुरु करण्यात यावी. निवड करण्यात आलेल्या लाभार्थ्यांना खावटी कर्जाचे वाटप ३१ मे, २०११ पूर्वी पूर्ण करण्यात यावे.

३. खावटी कर्जाचे वाटप ७०% वस्तूरुपाने व ३०% रोख स्वरुपात शासनाने दि.२०.७.२००४ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-१ मध्ये निश्चित केलेल्या दरानुसार व प्रमाणानुसार वाटप करण्यात यावे.

४. तीन लाख लाभार्थी निश्चित करताना शासन निर्णय क्र.खाकवा-२००४ /प्र.क्र.९६/ (भाग-२)/का.८, दि.२०.७.२००४ नुसार ५ संवेदनशील व इतर १० आदिवासी जिल्हयातील लाभार्थ्यांची खालीलप्रमाणे निवड करण्यात यावी :-

<u>संवेदनशील जिल्हे-</u>

| अ.क्र. | जिल्हा | दारिद्रय रेषेखालील अनुसूचित जमातीच्या कुटुंबांची संख्या | लाभार्थ्यांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | ठाणे | १८२९५७ | ६९०५७ |
| २ | नाशिक | १३९९८२ | ५२८३६ |
| ३ | नंदुरबार | १४५१३१ | ५४७७९ |
| ४ | अमरावती | ४५७६३ | १७२७३ |
| ५ | गडचिरोली | ४२५३७ | १६०५५ |
| | एकूण | ५५६३७० | २१०००० |

<u>उर्वरित १० जिल्हे-</u>

| अ.क्र. | जिल्हा | दारिद्रय रेषेखालील अनुसूचित जमातीच्या कुटुंबांची संख्या | लाभार्थ्यांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | रायगड | ४०४५६ | ९०९६ |
| २ | जळगांव | ४५१२८ | १०१४७ |
| ३ | अहमदनगर | २४०९३ | ५४१७ |
| ४ | पुणे | १५१८३ | ३४१४ |
| ५ | नांदेड | ३८८७९ | ८७४२ |
| ६ | यवतमाळ | ६००२४ | १३४९६ |
| ७ | गोंदिया | २५०१३ | ५६२४ |
| ८ | नागपूर | २६८७१ | ६०४२ |
| ९ | चंद्रपूर | ४९४७३ | १११२४ |
| १० | धुळे | ७५१५६ | १६८९८ |
| | एकूण | ४००२७६ | ९०००० |

जिल्हानिहाय उद्दिष्टांचे तालुकानिहाय उद्दिष्ट निश्चित करण्याची कार्यवाही संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प व अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी कुटुंबसंख्येच्या प्रमाणानुसार करावी. लाभार्थ्यांची निवड जसजशी निश्चित होईल तसतसे खावटी कर्जाचे वाटप तातडीने सुरु करावे, असे निर्देश संबंधित प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ यांना द्यावेत.

५. वरील लाभार्थ्यांची निवड करीत असताना खालील बाबींचे काटेकोरपणे पालन करावे :-

अ) ज्या कुटुंबांमध्ये कुपोषणग्रस्त ग्रेड-३ व ग्रेड-४ ची मुले आहेत, त्या कुटुंबाची निवड सर्वप्रथम करावी. त्यासाठी दारिद्रय रेषेची अट विचारात घेण्यात येऊ नये.

ब) कुपोषणग्रस्त लाभार्थ्यांनंतर दारिद्रय रेषेखालील आदिवासी परित्यक्ता, निराधार वृध्द व आदिम जमातीच्या लाभार्थ्यांची निवड करावी.

क) वरील अ व ब नुसार निवड झाल्यानंतर दारिद्रय रेषेखालील ज्या आदिवासी कुटुंबांना मागील वर्षी सदर योजनेचा लाभ मिळाला नाही, त्यांची निवड करावी. हा निकष अ व ब येथील लाभार्थ्यांसाठी लागू राहणार नाही.

ड) सद्य:स्थितीत कुपोषणाची स्थिती लक्षात घेता अमरावती जिल्हयासाठी दिलेले १७२७३ लाभार्थींचे उद्दिष्ट मेळघाट भागातील चिखलदरा व धारणी या दोन तालुक्यातीलच आदिवासी लाभार्थ्यांची सर्वप्रथम निवड करावी.

६. संदर्भ क्र. १ येथील दि.५ मे, २००१ च्या शासन निर्णयान्वये आश्रमशाळा व वसतीगृहासाठी धान्य व इतर वस्तू खरेदी करण्याची कार्यपध्दती विहीत करण्यात आली आहे. सदर शासन निर्णय खावटीच्या खरेदीसाठीही लागू होईल असा निर्णय संदर्भ क्र. ५ येथील दिनांक १९ मे, २००६ च्या शासन निर्णयान्वये घेतलेला आहे. त्यानुसार आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सन २०११-१२ वर्षासाठी आश्रमशाळा / वसतिगृहे यासाठी लागणारे धान्य व इतर साहित्य खरेदीबाबत जे दर निश्चित केले आहेत किंवा करण्यात येतील, त्या दराने खावटी कर्ज योजनेसाठी आवश्यक धान्य व इतर साहित्य खरेदी करण्यासाठी राष्ट्रीय उपभोक्ता महासंघ यांचेशी चर्चा करुन तसे आदेश त्यांनी निर्गमित करावेत. त्यानुसार राष्ट्रीय उपभोक्ता महासंघास पुरवठयाबाबत तातडीने आदेश देण्यात यावेत. मात्र धान्य व इतर साहित्याचे दर हे स्थानिक बाजारमूल्यापेक्षा जास्त राहणार नाहीत व त्याचा दर्जा योग्य राहील यांची खात्री दर निश्चिती समितीने करावी.

६. खावटी कर्ज वाटपाची कार्यवाही तातडीने सुरु करावी व ती दिनांक ३१ मे, २०११ अखेर पूर्ण होईल याबाबत दक्षता घेण्यात यावी. खावटी कर्ज वाटपाचा साप्ताहिक प्रगती अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा.

७. खावटी कर्जाचे वाटप करतांना शासन निर्णय दिनांक २४.३.२००८ मधील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच धान्य व वस्तूंचा दर्जा व दर योग्य राहिल याची दक्षता आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ व दर निश्चिती समिती यांनी घ्यावी.

८. यावरील खर्च "मागणी क्र.टी-५, मुख्य लेखाशिर्ष-२४२५-सहकार-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१)(११) खावटी कर्ज वाटप (२४२५१४९३) ३३-अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या वर्षात केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेताक २०११०३०८१४१७०२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(सो. ना.बागुल)
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रति,
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय मुंबई.
प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव,महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग (वने) मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग (महसूल) मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, (सहकार) सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
सहकार आयुक्त, पुणे.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
वित्त विभाग ( अर्थसंकल्प-१७/ व्यय-१४/ अर्थसंकल्प-३/ अर्थोपाय/ कोषा प्रशासन-५), मंत्रालय, मुंबई-३२.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
संचालक ( लेखा व कोषागारे ), संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक / नागपूर.
सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ.
मा.मंत्री / मा.राज्य मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व सह सचिव / उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (का.३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

----------